१६ व्या वित्त आयोगास महाराष्ट्र शासनाकडून सादर करावयाच्या निवेदनासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सोविआ ०१२४/प्र.क्र.०४/विआक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक - २६.०३.२०२४

**वाचा :-** केंद्र शासनाची अधिसूचना क्र. एसओ ५५३३ (३)/२०२३, दिनांक २७.१२.२०२३

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २८० व वित्त आयोग (संकीर्ण तरतूदी) अधिनियम, १९५१ (सन १९५१ चा ३३) अन्वये डॉ. अरविंद पनगढिया, पुर्व उपाध्यक्ष, निती आयोग व प्राध्यापक कोलंबिया विश्वविद्यालय यांच्या अध्यक्षतेखाली १६ व्या वित्त आयोगाची स्थापना संदर्भाधीन अधिसूचने अन्वये केली आहे. सदर आयोग दि. ३१ ऑक्टोबर, २०२५ पर्यंत त्यांचा अहवाल केंद्र शासनास सादर करणार आहे.

केंद्र शासनाने आयोगाची स्थापना केल्यानंतर, राज्य शासनामार्फत आयोगास निवेदन (Memorandum) सादर करण्यात येते, ज्यामध्ये राज्याच्या आर्थिक स्थितीचे व भविष्यातील गरजाचे प्रतिबिंब असते. केंद्र शासन, त्यांच्या संकलित महसुलातून राज्य शासनास द्यावयाचा वाटा निर्धारीत करताना हे निवेदन सहाय्यीभूत ठरते. या पार्श्वभूमीवर सदरहू निवेदन अतिशय महत्वपूर्ण व अभ्यासनीय दस्तऐवज ठरत असल्यामुळे ते तयार करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाकडून, १६ व्या केंद्रीय वित्त आयोगास सादर करावयाचे निवेदन तयार करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) | श्री. सुधीर श्रीवास्तव, सेवानिवृत्त भा.प्र.से. | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४) | सचिव (वित्तीय सुधारणा) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५) | प्रधान सचिव आणि विकास आयुक्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६) | अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७) | प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग व पंचायत राज विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई | सदस्य |
| ८) | प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९) | प्रधान सचिव, मदत आणि पुनर्वसन विभाग,मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| १०) | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ११) | श्री. विश्वनाथ गिरीराज, सेवानिवृत्त भा.प्र.से. | सदस्य |
| १२) | श्री. के. श्रीनिवासन, सेवानिवृत्त, भारतीय लेखापरिक्षण व लेखा सेवा, भारत सरकार | सदस्य |
| १३) | उप सचिव (वित्त आयोग कक्ष), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

समिती, संबंधित सचिवांशी वा इतर तज्ञ व्यक्तींशी आवश्यक असल्यास सल्लामसलत करेल. समितीचा कालावधी दि.१५.०५.२०२४ पर्यंत असेल. तसेच कामाची व्याप्ती लक्षात घेऊन हा कालावधी वाढविण्याचे अधिकार मुख्यसचिव यांना राहतील.

२. सदर समितीच्या मा. अध्यक्ष महोदयांना रुपये २,५०,०००/- (रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) व अशासकीय सदस्य यांना रुपये १,५०,०००/-(रुपये एक लक्ष पन्नास हजार फक्त) एवढे एकरकमी मानधन देय राहील. तसेच बैठक भत्ता व वाहन खर्च हा शासकीय नियमानुसार अनुज्ञेय राहील.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक जी-४, प्रधानशीर्ष २०५२, सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा (००) (०९०) सेक्रेटरिएट (००) (०१) वित्त विभाग (२०५२ ०२३२) १३, कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१५३८४५७३०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2024.03.26 15:48:39 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन वित्त विभाग,**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव,
५. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद, विधान भवन, मंबई,
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. श्री. सुधीर श्रीवास्तव, सेवानिवृत्त भा.प्र.से., भारत सरकार
९. श्री. विश्वनाथ गिरीराज, सेवानिवृत्त भा.प्र.से.
१०. श्री. के. श्रीनिवासन, सेवानिवृत्त, भारतीय लेखापरिक्षण व लेखा सेवा, भारत सरकार
११. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग,मंत्रालय, मुंबई.
१२. विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगाव, मुंबई
१३. निवडनस्ती, वित्त आयोग कक्ष.